महाराष्ट्र लोकसेवा आयोग कार्यालय, मुंबई
यांच्या आस्थापनेवरील पदांचा
सुधारित आकृतीबंध.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
**शासन निर्णय, क्रमांक : मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
**दिनांक :- ५ ऑक्टोबर, २००६**

**वाचा :**१) वित्त विभाग शासन पृष्ठांकन क्रमांकः पदनि/१०.०६/प्र.क्र.४६/२००६/वितीय सुधारणा-१, दिनांक १३ जून, २००६
२) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.असंक १००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १०/९/२००१
३) सा.प्र.वि. शासन निर्णय, क्रमांक : मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दिनांक.४/४/२००६
४) मा. अध्यक्ष,महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे अर्ध शासकीय पत्र क्र.५२/अस्थायी पदे/पाच, दिनांक २७/९/२००६

**शासन निर्णय :**

मंत्रालयीन प्रशासकीय विभाग व त्यांच्या नियंत्रणाखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांच्या कार्यालयातील अस्तित्वात असलेल्या पदांचा संबंधित प्रशासनिक विभागांनी आढावा घ्यावा व या आढाव्याच्या माध्यमातून अतिरिक्त पदे ठरविणे, अतिरिक्त पदांपैकी जी पदे रिक्त आहेत ती नष्ट करणे, जी पदे अतिरिक्त ठरलेली आहेत अशा पदांवरील कर्मचाऱ्यांना अतिरिक्त संवर्ग कक्षाकडे वर्ग करणे यासारखी कार्यवाही करून विभागास आवश्यक असलेली पदे निश्चित करावी, असे वित्त विभागाचे आदेश आहेत. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या आस्थापनेवरील पदांचा संयुक्त सचिव समितीने घेतलेल्या आढाव्यानुसार आयोगात रिक्त असलेली ११ पदे (लिपिक-टंकलेखक ९, वाहन चालक १ आणि शिपाई १) रद्द करावी असे संयुक्त सचिव समितीने आढाव्याअंती ठरविले. परिणामी आयोगाच्या आस्थापनेवर मूळ मंजूर २४२ पदांपैकी गट अ ते ड मधील एकूण २३१ पदांना मान्यता देण्यात आली.

२. संयुक्त सचिव समितीच्या वरील शिफारशीनंतर आयोगाच्या आस्थापनेवर एक स्वतंत्र विधी कक्ष निर्माण करण्याचा प्रस्ताव आयोगाकडून दिनांक २८/११/२००५ रोजी प्राप्त झाला होता. त्यामुळे मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्च स्तरीय सचिव समितीला प्रस्ताव सादर करताना वरील परिच्छेदात नमूद केलेल्या संयुक्त सचिव समितीच्या शिफारशी व आयोगाचा वरील विधी कक्षाकरीता चार नवीन पदे निर्मितीचा प्रस्ताव वित्त विभागामार्फत (उच्चस्तर सचिव समितीस) आदेशार्थ सादर करण्यात आला.

३. उच्चस्तर सचिव समितीने दिनांक ५/६/२००६ रोजी झालेल्या बैठकीत संयुक्त सचिव समितीने महाराष्ट्र लोकसेवा आयोगातील पदांच्या घेतलेल्या आढाव्यास मान्यता दिली. परिणामी आयोगातील गट क व ड मधील रिक्त असलेली जी ११ पदे अतिरिक्त ठरविण्यात आली होती ती रद्द करण्यात आली. सदर पदे रिक्त असल्याने कोणत्याही कर्मचाऱ्यास अतिरिक्त संवर्गाकडे वर्ग करण्याचा प्रश्न उद्भवला नाही. त्यामुळे गट अ ते ड मधील उर्वरित २३१ पदांचा आकृतीबंध

९३

## सा.प्र.वि.शा.नि. क्र.मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दि.५/१०/२००६ सोबतचे विवरणपत्र ब

महाराष्ट्र लोकसेवा आयोग कार्यालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर याकरीता निश्चित केलेल्या पदांच्या आकृतीबंधानंतर नव्याने निर्माण केलेली पदे

| अ.क्र. | पदनाम | गट | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | विधी अधिकारी | अ | १ |
| २ | विधी सहायक | ब | १ |
| ३ | लिपिक-टंकलेखक | क | १ |
| ४ | शिपाई | ड | १ |
| एकूण | | | ४ |

टिप :- १) वरील विवरणपत्रातील अनुक्रमांक १ व २ येथील पदे विधी व न्याय विभागामार्फत प्रतिनियुक्तीने भरण्यात येतील.

२) वरील विवरणपत्रातील अनुक्रमांक ३ व ४ येथील पदे वित्त विभागाच्या अतिरिक्त संवर्ग कक्षाव्दारे उपलब्ध केलेल्या कर्मचाऱ्यांतून भरण्यात येतील.

उच्चस्तर सचिव समितीने मान्य केला. याशिवाय वरील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या व आयोगाच्या कार्यालयात विधी अधिकारी गट-अ, विधी सहायक गट ब, लिपिक-टंकलेखक गट-क आणि शिपाई गट-ड प्रत्येकी एक अशी चार पदे नव्याने निर्माण करण्यास देखील उच्चस्तर सचिव समितीने दिनांक ५/६/२००६ च्या बैठकीत मान्यता दिली.

४. याप्रमाणे उच्चस्तर सचिव समितीने मान्यता दिलेल्या आयोगाच्या कार्यालयातील गट 'अ' ते 'ड' मधील एकूण २३१ पदे अधिक नव्याने निर्माण करण्यात आलेली विधी कक्षातील ४ पदे असा एकूण २३५ पदांचा आकृतीबंध (पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्र 'अ' प्रमाणे आहे) मंजूर केला.

यामंजूर आकृतीबंधातील २३५ पदांपैकी हंगामी असलेली व संदर्भाधीन क्रमांक ३ येथील शासन निर्णय क्रमांक-मलोआ-१००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दि.४/४/२००६ व्दारे पुढे चालू ठेवण्यात आलेली हंगामी पदे आता या शासन निर्णयाव्दारे दिनांक १/९/२००६ ते २८/२/२००७ (दोन्ही दिवस धरून) पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. आढाव्यापूर्वी आयोगास मंजूर असलेली पदे, विवरणपत्रातील मंजूर पदांच्या स्तंभ क्र.४ मध्ये व आढाव्याअंती कमी करून निश्चित केलेली पदे व नव्याने निर्माण केलेली जादा पदे या पदांचा समावेश करून महाराष्ट्र लोकसेवा आयोगातील पदांचा सुधारीत आकृतीबंधाची पदे विवरणपत्र-ब मध्ये स्तंभ क्र.७ मध्ये दर्शविण्यात आली आहेत.

५. विवरणपत्र 'ब' मधील स्तंभ ७ मध्ये दर्शविलेल्या २३५ पदांवर होणारा खर्च महाराष्ट्र लोकसेवा आयोग कार्यालय, मुंबई, यांच्या प्रचलित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या-त्या वर्षीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र ३५८/०६/व्यय-४, दि.२/५/२००६ अन्वये प्राप्त झालेल्या त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर आढाव्यास मा. अध्यक्ष, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्र. ४ येथील दि. २७/९/२००६ च्या अर्ध शासकीय पत्राव्दारे दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( प्र. कृ. लोखंडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
२. महालेखापाल -१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५. विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई, (पत्राने २ प्रती)
७. वित्त विभाग, (व्यय-४),/ वित्तीय सुधारणा-१, मंत्रालय, मुंबई,
८. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक १९,१९-अ, व २५, मंत्रालय, मुंबई,
९. निवड नस्ती. (२ प्रती)



**सा.प्र.वि.शा.नि. क्र.मलोआ-२००५/८८८/प्र.क्र.५८/०५/आठ, दि.५/१०/२००६ सोबतचे**

**विवरणपत्र - अ**

**महाराष्ट्र लोकसेवा आयोग कार्यालय, मुंबई यासाठी आवश्यक असलेली गट-अ ते गट-ड संवर्गातील पदांची माहिती**

| अ.क्र. | गट | संवर्ग | मंजूर पदे | आढाव्या अंती कार्यालयास आकृतीबंधानुसार आवश्यक ठरविलेली पदे | आकृतीबंध ठरविल्यानंतर सप्टेंबर २००६ पर्यंतच्या कालावधीत निर्माण केलेली पदे | सुधारित आकृतीबंधानुसार आयोगास आवश्यक असलेली पदे |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | अ | सचिव | १ | १ | -- | १ |
| २ | अ | उप सचिव | ५ | ५ | -- | ५ |
| ३ | अ | अवर सचिव | १२ | १२ | -- | १२ |
| ४ | अ | अध्यक्षांचे स्वीय सहायक | १ | १ | -- | १ |
| ५ | अ | परीक्षा संशोधन अधिकारी | १ | १ | -- | १ |
| ६ | अ | विधी अधिकारी | -- | -- | १ * | १ |
| ७ | ब | लेखाधिकारी | १ | १ | -- | १ |
| ८ | ब | सांख्यिकी अधिकारी | १ | १ | -- | १ |
| ९ | ब | कक्ष अधिकारी | १५ | १५ | -- | १५ |
| १० | ब | लघुलेखक (उच्चश्रेणी) | ४ | ४ | -- | ४ |
| ११ | ब | लघुलेखक (निम्नश्रेणी) | २ | २ | -- | २ |
| १२ | ब | विधी सहायक | -- | -- | १ * | १ |
| १३ | ब | सहायक | ७६ | ७६ | -- | ७६ |
| १४ | ब | सांख्यिकी सहायक | १ | १ | -- | १ |
| १५ | क | ग्रंथपाल | १ | १ | -- | १ |
| १६ | क | लिपिक-टंकलेखक | ७२ | ६३ | १ * | ६४ |
| १७ | क | वाहनचालक | ९ | ८ | -- | ८ |
| १८ | क | चोपदार | १ | १ | -- | १ |
| १९ | ड | नाईक | ७ | ७ | -- | ७ |
| २० | ड | शिपाई | २५ | २४ | १ * | २५ |
| २१ | ड | हमाल | ६ | ६ | -- | ६ |
| २२ | ड | स्वच्छक | १ | १ | -- | १ |
| | | एकूण | २४२ | २३१ | ४ | २३५ |

*** प्रस्तुत ४ जादा पदे नव्याने निर्माण केली असून त्याला उच्चस्तरीय सचिव समितीने पदांच्या आढाव्यांतर्गत मान्यता दिलेली आहे.**